**जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राज्यातील दिव्यांग व्यक्तींच्या कल्याण व सक्षमीकरणाकरीता १% निधीची तरतूद करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र.डिएपी १०२५/प्र.क्र.३२/का.१४८१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ३२.
दिनांक : १० फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना :-**

सन २०११ च्या जनगणणेनुसार महाराष्ट्र राज्यात दिव्यांग व्यक्तींची संख्या महाराष्ट्र राज्याच्या एकूण लोकसंख्येच्या २.६३% इतकी आहे. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांनी दि.०५ फेब्रुवारी, २०२५ च्या राज्यस्तर जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०२५-२६ आराखडा बैठक यात राज्यातील दिव्यांग व्यक्तींच्या कल्याण व सक्षमीकरणाकरीता जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत कमाल १% पर्यंत निधी राखून ठेवण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत नाविण्यपूर्ण योजना, शाश्वत विकास ध्येय आणि मूल्यमापन संनियत्रण व डाटा एन्ट्री यासाठीच्या एकंदरीत ५ टक्के निधी वगळून नियमित योजनांसाठी अनुज्ञेय असलेल्या ९५ टक्के निधीमधून १९ टक्के निधी विविध प्रशासकीय विभागांच्या नियमित योजनांसाठी निधी राखून ठेवण्यात येतो.

राज्यातील दिव्यांग व्यक्तींचे लक्षणिय लोकसंख्या विचारात घेता, त्यांच्या कल्याण व सक्षमीकरणाकरीता जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०२५-२६ पासून प्रत्येक वर्षी नियमित योजनांसाठी अनुज्ञेय असलेल्या निधीमधून राज्यातील दिव्यांग व्यक्तींच्या कल्याण व सक्षमीकरणाकरीता कमाल १% पर्यंत निधी राखीव ठेवण्याची तरतूद करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

“जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण)” अंतर्गत “दिव्यांग व्यक्तींचे सक्षमीकरण व कल्याण” या करीता राखून ठेवावयाच्या एक टक्का निधीचा सुयोग्य विनियोग होण्याकरीता त्यासंबंधीच्या योजनेचे सुस्पष्ट आदेश नियोजन विभाग, वित्त विभाग यांच्या मान्यतेने दिव्यांग कल्याण विभागाकडून निर्गमित करण्यात येतील. प्रस्तुत योजनेसाठी लेखाशिर्ष प्राप्त करुन घेण्यासंदर्भातील कार्यवाही दिव्यांग कल्याण विभागाने तातडीने करावी.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०२१०१८१५१९५११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHAMA VIVEK KAMBLI

Digitally signed by SUSHAMA VIVEK KAMBLI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARMENT, 2.5.4.20=4e799d8d86920568154662ccd3b04c6e8002ed0d48f16933f57fa95ac189b330, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9899D1573C39423ACFB8F67E9C8AEA6D8FB6B33C61F94A33819BAA81E8669F35, cn=SUSHAMA VIVEK KAMBLI
Date: 2025.02.10 18:16:50 +05'30'

**(सुषमा कांबळी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.
२. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, महाराष्ट्र शासन.
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र शासन.
४. कार्याध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, नवीन प्रशासकयी भवन, मंत्रालयासमोर, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
६. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, महाराष्ट्र शासन.
७. सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय इमारत, १८ वा मजला, मंबई.
८. सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय कंपाऊंड, तळमजला, छत्रपती संभाजीनगर.
९. सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, बी-२३/१, साऊथ अंबाझरी मार्ग, अंध विद्यालयाजवळ, नागपूर.
१०. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र शासन.
११. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र शासन.
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र शासन.
१३. संचालक, दिव्यांग कल्याण संचालनालय, महाराष्ट्र शासन.
१४. नियोजन विभागातील सर्व सह सचिव / उप सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
१५. सर्व उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय.
१६. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय.
१७. सर्व कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१८. निवड नस्ती, कार्या.१४८१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.